महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ अन्वये मा.उच्च न्यायालयातील दाखल अपील/रिट प्रकरणी घ्यावयाची दक्षता.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : न्यायप्र -२०१७/ प्र.क्र.१७७/र-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १० ऑगस्ट, २०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त पुनर्वसन अधिनियम, १९८६, महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त पुनर्स्थापना अधिनियम, १९७६ आणि महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ नुसार राज्यातील प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसनविषयक समस्या, गा-हाण्यांचे निराकारण समाधानकारक झाले नाही, प्रकल्पग्रस्तांच्या मागण्यांची पुर्तता करण्यास झालेला विलंब, पर्यायी जमिनीचे वाटप इत्यादी विषयांबाबत मा. मुंबई उच्च न्यायालयात विविध रिट याचिका सद्यस्थितीत दाखल असुन त्या न्यायप्रविष्ठ आहेत. शासकीय अभियोक्ता (ए.एस.) रिट सेल उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कडून मा.उच्च न्यायालयात सुरु असलेल्या अपील/रिट प्रकरणांमध्ये मा.उच्च न्यायालयात उपस्थित राहणे, रिट याचिकेमध्ये उपस्थित केलेल्या मुद्यांच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयात शपथपत्र सादर करणे, मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांचे काटेकोरपणे पालन करणे, इत्यादी बाबत शासनाचे संबंधित जिल्हा पुनर्वसन अधिकारी दुर्लक्ष करीत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त पुनर्वसन अधिनियम, १९८६ आणि महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त पुनर्स्थापना अधिनियम, १९७६, महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ अंतर्गत मा.उच्च न्यायालयातील अपील/रिट प्रकरणांमध्ये विहीत मुदतीत परिच्छेदनिहाय अभिप्राय व शपथपत्र दाखल केले जात नसल्याने सरकारी वकील यांना शासनाची बाजू व्यवस्थितपणे मांडता येत नाही. यासाठी वरिष्ठ न्यायालयातील अपील/रिट प्रकरणांमध्ये सुसूत्रता राखण्यासाठी खालील प्रमाणे कार्यवाही करण्याचे आदेश शासन देत आहे.

**परिपत्रक :-**

महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम,अंतर्गत मा.उच्च न्यायालयात सुरु असलेल्या अपील/रिट प्रकरणांमध्ये अवमान याचिकेची प्रकरणे टाळण्यासाठी व अशा प्रकरणांमध्ये जबाबदार अधिकाऱ्यांकडून योग्य व कालमर्यादित कार्यवाही खालील प्रमाणे करण्यात यावी.

१) संबंधित जिल्हा पुनर्वसन अधिकारी यांच्या कार्यक्षेत्रात पुनर्वसन अधिनियमांतर्गत अपील/रिट प्रकरण मा.उच्च न्यायालयात दाखल झाल्यास, शासकीय अभियोक्ता यांनी संबंधित जिल्हा पुनर्वसन अधिकारी यांच्या कार्यालयाशी संपर्क साधून संबंधित याचिकेची प्रत तातडीने उपलब्ध करुन द्यावी. तसेच, संबंधित अभियोक्ता कार्यालयाचे संपर्क क्रमांक त्या पत्रात स्पष्ट नमुद करावे, जेणेकरून जिल्हा पुनर्वसन अधिकारी त्यांचेशी त्वरीत संपर्क करू शकतील.

२) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकाऱ्यांनी त्यांचे कार्यालयीन दुरध्वनी क्रमांक, भ्रमणध्वनी क्रमांक तसेच ईमेल आयडी संबंधित शासकीय अभियोक्ता यांना उपलब्ध करुन द्यावेत.

३) सदर याचिकेतील उपस्थित मुद्यांसंदर्भात शासकीय अभियोक्ता यांचेशी चर्चा करुन परिच्छेदनिहाय अभिप्राय तयार करुन ते शपथपत्राचा मसूदा तयार करण्यासाठी शासकीय अभियोक्ता यांना विनाविलंब उपलब्ध करुन देण्यात यावेत.

४) शासकीय अभियोक्ता यांचेकडे शपथपत्राचा मसूदा तयार करुन देण्यासाठी पाठपूरावा करण्यात यावा व शपथपत्राचा मसूदा प्राप्त झाल्यानंतर सदर मसूद्यास आवश्यकतेनुसार शासन/विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांची मान्यता प्राप्त करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

५) शपथपत्राच्या मसुद्यास मान्यता प्राप्त झालेनंतर सदर शपथपत्र मा.न्यायालयास सादर करण्यात यावे.

६) शपथपत्र मा.न्यायालयास सादर करण्यात आल्यानंतर सदर प्रकरणासंदर्भातील मा.न्यायालयात वेळोवेळी होणाऱ्या सुनावणीस संबंधित जबाबदार अधिकारी यांनी व्यक्तीशः उपस्थित रहावे.

७) सदर सुनावणी दरम्यान मा.न्यायालयाने पूरक माहिती / कागदपत्रे / पुरावे सादर करण्याचे आदेश दिल्यास त्याबाबींची पूर्तता विनाविलंब करण्यात यावी.

८) शासकीय अभियोक्ता यांनी काही आवश्यक माहितीची विचारणा केल्यास, त्याबाबतही दिरंगाई करण्यात येऊ नये. शासकीय अभियोक्ता यांना सुनावणीसाठी पूरक माहिती वेळोवेळी पुरवण्यात यावी ज्यायोगे शासकीय अभियोक्ता यांना शासनाची बाजू मा.न्यायालयात सक्षमपणे/खंबीरपणे मांडणे शक्य होईल.

९) विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयामध्ये पुनर्वसन अधिनियमांतर्गत न्यायालयीन प्रकरणे सुसूत्रता राहण्यासाठी "नोडल अधिकारी" यांची नियुक्ती करण्यात यावी. संबंधित नोडल अधिकारी यांनी मा.उच्च न्यायालयातील प्रलंबित प्रकरणांची तपासणी मा.उच्च न्यायालयाच्या संकेतस्थळावरुन करुन संबंधित अधिकाऱ्यांना त्याबाबत तातडीने कार्यवाही करण्यासाठी लेखी पत्राने अवगत करावे.

१०) विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयीन साप्ताहिक बैठकीमध्ये सदर प्रकरणांचा समावेश करुन त्याचा आढावा घेण्यात यावा.

वरील नमूद आदेशांचे तंतोतंत पालन करण्याच्या सक्त सूचना संबंधित विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त अधिकाऱ्यांना त्वरेने देण्यात याव्यात. या उपरही संबंधित जबाबदार अधिकाऱ्यांनी संबंधित न्यायालयीन प्रकरणी उपरोक्त सूचनांचे पालन न केल्यामुळे मा. न्यायालयाने दंडात्मक कार्यवाही केल्यास सदर दंडाची रक्कम ही संबंधित जबाबदार अधिकारी/ कर्मचारी यांनी मा.न्यायालयात भरणा करावी. याकरिता शासनाच्या कोणत्याही लेखाशिर्षाखाली दंडात्मक रक्कमेची भरपाई करता येणार नाही. याबाबतही संबंधित अधिकाऱ्यांना अवगत करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०८१०१२४८१८६६१९ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Shivaji P Karwar

Digitally signed by Shivaji P Karwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, cn=Shivaji P Karwar
Date: 2017.08.10 12:38:44 +05'30'

**( शिवाजी पां. कारवार )**
कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी,
३) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी

**प्रत,**

१ मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई,
२ शासकीय अभियोक्ता (ए.एस.), रिट सेल, उच्च न्यायालय, मुंबई ,
३ अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४ निवडनस्ती (र-१).